**जमेचे नवीन उपशीर्ष सुरु करणेबाबत -**
**प्रशासकीय मान्यतेबाबत-**
**मुख्य लेखाशीर्ष "०२३०-कामगार व सेवायोजन"**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफएसी २०१८/प्र.क्र.१७/काम-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १२ डिसेंबर, २०१८.

वाचा :- **शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक ओपीएन-०२३०/२००५- २००६/ (८६०५)/प्रशासन-१, दिनांक ११.०७.२००५.**

**प्रस्तावना :-**

विभागाने संदर्भाधीन दिनांक ११.०७.२००५ च्या शासन निर्णयान्वये प्रमाणक शल्य चिकित्सक यांचे नियुक्ती शुल्क भरणा करण्याकरिता ०२३०-कामगार व सेवायोजन, ८००-इतर जमा रक्कम, (००) (१३) हे नवीन उपशीर्ष सुरु करण्याकरिता मान्यता दिलेली होती. परंतु, सदर लेखाशीर्ष निद्रीस्त झाल्याने प्रमाणक शल्यचिकित्सक यांच्या नोंदणी व नूतनीकरण शुल्काच्या भरणा करण्याकरिता नवीन जमा लेखाशीर्ष मिळणेबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. वित्त विभागाने सुचित केल्यानुसार प्रमाणक शल्यचिकित्सक यांच्या नोंदणी व नूतनीकरण शुल्काच्या भरणा करण्याकरिता नवीन जमेच्या लेखाशीर्षाला महालेखापाल कार्यालयाची मान्यता घेण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

प्रमाणक शल्यचिकित्सक यांच्या नोंदणी व नूतनीकरण शुल्काच्या भरणा करण्याकरिता खालील नवीन जमेच्या लेखाशीर्षाला वित्त विभाग व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र मुंबई यांची मान्यता घेण्यात आली असून खालील जमेच्या लेखाशीर्षाखाली प्रमाणक शल्यचिकित्सक यांच्या नोंदणी व नूतनीकरण शुल्क आकारण्यास व भरणा करण्यास शासनाची याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

" ०२३०, कामगार व सेवायोजन,
१०४, कारखाने अधिनियमांतर्गत जमा होणारे शुल्क,
(००) (०३) प्रमाणक शल्यचिकित्सकांची नोंदणी व नुतनीकरण शुल्क
(०२३० ०२४१)"

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २६६/अर्थ-१४/१८, दिनांक ३०.११.२०१८ व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८३५, दिनांक ०५.११.२०१८ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१२१७११४७९९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Umesh Madhukar Madan

Digitally signed by Umesh Madhukar Madan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6a20cbbc812f8be8371fb8e96ab39865278090eca38793fc8e3967bd332d3272, serialNumber=e98cacd4b7292ff0c203dc412495d2db2d4f07c86fb6bf1e25fca5c35f88e1c4, cn=Umesh Madhukar Madan
Date: 2018.12.26 16:50:25 +05'30'

**( उ. म. मदन )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४) सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-१४), मंत्रालय, मुंबई-३२,
५) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) उप सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) उप सचिव (अर्थसंकल्प) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) निवडनस्ती, (कामगार-४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,